**निरीक्षण अधिकारी(पुरवठा),गट ब(राजपत्रित) या संवर्गातील अधिकाऱ्यांच्या नियतकालीक बदल्या-२०२३.**

# महाराष्ट्र शासन

**अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**

**शासन आदेश क्रमांक : बदली-२३२३/प्र.क्र.१३३/ ना.पु.१५.**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई -४०००३२.
दिनांक:-१४ जून, २०२३.

**वाचा:-**१) महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५.

२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.बदली-२०२३/प्र.क्र.३२/कार्या १२, दि.३० मे, २०२३.

**शासन आदेश**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४ मधील तरतूदीनुसार सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेनुसार **निरीक्षण अधिकारी(पुरवठा),गट-ब(राजपत्रित)** या संवर्गातील खालील तक्त्यात नमूद अधिकाऱ्यांच्या बदल्या/मुदतवाढ त्यांच्या नावासमोरील स्तंभ ४ मध्ये दर्शविलेल्या ठिकाणी करण्यात येत आहे:-

| अ. क्र. | निरीक्षण/परिमंडळ अधिकारी यांचे नाव | सध्या कार्यरत ठिकाण | बदलीनंतर पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | श्री.सुहास ग. टोंग | हिंगणघाट, जिल्हा-वर्धा | श्री.कुमरे यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या निरीक्षण अधिकारी (पुरवठा), काटोल, जिल्हा-नागपूर या पदावर. |
| २. | श्री. भरतकुमार प. तुंबडे | चंद्रपूर, जिल्हा-चंद्रपूर | श्री.टोंग यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या निरीक्षण अधिकारी (पुरवठा), हिंगणघाट, जिल्हा-वर्धा या पदावर. |
| ३. | श्री. आप्पासाहेब क. पाटील | देसाईगंज, जिल्हा-गडचिरोली | निरीक्षण अधिकारी (पुरवठा), देवळी, जिल्हा-वर्धा या रिक्त पदावर. |

| | | | |
|---|---|---|---|
| ४. | श्री. आनंद र. पडोळे | भंडारा, जिल्हा-भंडारा | कार्यरत पदावर एक वर्षासाठी मुदतवाढ देण्यात येत आहे. |
| ५. | श्रीम.रागिणी ल. गायकवाड | फ-परिमंडळ, नागपूर(शहर) | निरीक्षण अधिकारी (पुरवठा), हिंगणा, जिल्हा-नागपूर या रिक्त पदावर. |
| ६. | श्रीम. भारती भा. वाकोडे | गोंदिया, जिल्हा-गोंदिया | कार्यरत पदावर एक वर्षासाठी मुदतवाढ देण्यात येत आहे. |
| ७. | श्रीम. शिल्पा ग. दरेकर | अहेरी, जिल्हा-गडचिरोली | परिमंडळ अधिकारी, अ-परिमंडळ, नागपूर या रिक्त पदावर. |
| ८. | श्री. प्रशांत मो. खताळ | ई परिमंडळ, पुणे | परिमंडळ अधिकारी, अ-परिमंडळ, चिंचवड, जिल्हा-पुणे या रिक्त पदावर. |
| ९. | श्री. सुमेर प्र. चवरे | क परिमंडळ, नागपूर | कार्यरत पदावर एक वर्षासाठी मुदतवाढ देण्यात येत आहे. |
| १०. | श्री. लक्ष्मण बा. माने | ग विभाग, पुणे | निरीक्षण अधिकारी (पुरवठा), बारामती, जिल्हा-पुणे या रिक्त पदावर. |
| ११. | श्री. रविंद्र चं. यन्नावार | अकोट,जिल्हा-अकोला | निरीक्षण अधिकारी (पुरवठा), बाळापूर, जिल्हा-अकोला या रिक्त पदावर. |
| १२. | श्रीम.रुपाली के. सोळंके | मंगरूळपिर,जिल्हा-वाशिम | निरीक्षण अधिकारी (पुरवठा), वरूड, जिल्हा-अमरावती या रिक्त पदावर. |
| १३. | श्री. गजानन एन. टेकाळे | मेहकर,जिल्हा-बुलढाणा | निरीक्षण अधिकारी (पुरवठा), चिखली, जिल्हा-बुलढाणा या रिक्त पदावर. |
| १४. | श्री. गजानन अ. देशमुख | ह विभाग, पुणे | श्री.भोसले यांच्या पदोन्नतीने रिक्त झालेल्या परिमंडळ अधिकारी, फ-परिमंडळ, भोसरी,जिल्हा-पुणे या पदावर. |
| १५. | श्री. अनिल रा. गवळी | क-परिमंडळ, सोलापूर | निरीक्षण अधिकारी (पुरवठा), करमाळा, जिल्हा-सोलापूर या रिक्त पदावर. |

| | | | |
|---|---|---|---|
| १६. | श्री. नितीन शं. वाघ | ब-परिमंडळ, सोलापूर | निरीक्षण अधिकारी (पुरवठा), दौंड, जिल्हा-पुणे या रिक्त पदावर. |
| १७. | श्री. प्रशांत वि. सुपेकर | परभणी, जिल्हा-परभणी | निरीक्षण अधिकारी (पुरवठा), बीड, जिल्हा-बीड या रिक्त पदावर. |
| १८. | श्री.कमलेश तु. कुमरे | काटोल, जिल्हा-नागपूर | निरीक्षण अधिकारी (पुरवठा), समुद्रपुर,जिल्हा-वर्धा या रिक्त पदावर. |

२. वरील तक्त्यात नमूद अधिकाऱ्यांना दिनांक १५.०६.२०२३ (म. नं.) रोजी त्यांच्या नावासमोरील स्तंभ क्र.३ मध्ये नमूद ठिकाणाहून एकतर्फी कार्यमुक्त करण्यात येत आहे. संबंधित अधिकाऱ्यांनी बदलीच्या पदावर तात्काळ रुजू व्हावे. संबंधित उप आयुक्त(पुरवठा) यांनी त्यांना बदलीच्या पदावर रुजू करून घेऊन त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

३. वरील तक्त्यात नमूद अधिकाऱ्यांची नियतकालिक बदली असल्याने त्यांना बदलीच्या ठिकाणी रुजू होण्याकरीता महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील तरतुदीनुसार पदग्रहण अवधी तसेच बदली विषयक प्रवास भत्ता व इतर अनुषंगिक लाभ अनुज्ञेय आहे.

४. वरील तक्त्यात नमूद बदली झालेल्या अधिकाऱ्यांनी बदली रद्द करणे अथवा त्यासाठी प्रत्यक्ष अथवा अप्रत्यक्षरित्या दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न केल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे ती गैरवर्तणूक समजून त्यांचे विरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

५. वरीलप्रमाणे पदस्थापना करण्यात आलेल्या अधिकाऱ्याला पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करु नये व महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील नियम ३०(सी) नुसार मूळ कार्यालयाने पदस्थापना झालेल्या अधिकाऱ्याचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारू नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास ते संबंधित अधिकाऱ्यास मूळ पत्त्यावर नोंदणी पोचदेय डाकेने परत करावेत.

६. तसेच उपरोक्त तक्त्यात नमूद बदली झालेल्या अधिकाऱ्यांनी बदली अधिनियमानुसार सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने पारीत केलेल्या आदेशाचे पालन न करणे ही बाब गंभीर स्वरूपाची असून यामुळे पालन न करणारा अधिकारी, विभागीय चौकशी नियम पुस्तिका १९९१ च्या प्रकरण २ मधील कलम-२.१(२)(पाच) अन्वये निलंबनाच्या कार्यवाहीस पात्र ठरेल.

७.	सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०६१४१८०४३५२१०६ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GAJANAN RAMDAS DESHMUKH

Digitally signed by GAJANAN RAMDAS DESHMUKH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLIES AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, 2.5.4.20=09c74e56a555b1257e71176f4c700164528f1b5b3ff73c027668f5ff29c069da, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DEE8A196FB0BB879933A88F87075CC443D363994879D49E0C1BA541465369700, cn=GAJANAN RAMDAS DESHMUKH
Date: 2023.06.14 18:06:01 +05'30'

**(गजानन रा. देशमुख)**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

संबंधित अधिकारी (यांना संबंधित विभागाच्या उप आयुक्त(पुरवठा) यांच्यामार्फत.)

**प्रत:-**

१) विभागीय आयुक्त, पुणे/औरंगाबाद/अमरावती/नागपूर.
२) उप आयुक्त(पुरवठा),पुणे/औरंगाबाद/अमरावती/नागपूर.
३) मा.मंत्री (अ.ना.पु. व ग्रा.सं.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) सचिव (अ.ना.पु. व ग्रा.सं.) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
५) महालेखापाल महाराष्ट्र-१/२(लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर.
६) जिल्हा पुरवठा अधिकारी, वर्धा/नागपूर/गोंदिया/भंडारा/सोलापूर/पुणे/अकोला/अमरावती/बुलढाणा/बीड/परभणी/वाशिम/गडचिरोली/चंद्रपूर.
७) अन्नधान्य वितरण अधिकारी,सोलापूर/पुणे/नागपूर.
८) जिल्हा कोषागार अधिकारी, वर्धा/नागपूर/गोंदिया/भंडारा/सोलापूर/पुणे/अकोला/अमरावती/बुलढाणा/बीड/परभणी/वाशिम/गडचिरोली/चंद्रपूर.
९) कक्ष अधिकारी, सर्व कार्यासने, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०)निवड नस्ती(ना.पु.-१५).